सन २०१९-२०२०
वितरण आदेश

**माहितीचा अधिकार अधिनियमाखाली प्रशिक्षण देण्याकरिता यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांस सहाय्यक अनुदान २०१९-२०२० (कार्यक्रम)**
**ऑगस्ट ते डिसेंबर २०१९ (दुसरा हप्ता)**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण २०१९/प्र.क्र.५१/सहा,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० नोव्हेंबर, २०१९

**वाचा:** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं २०१९/ प्र.क्र.४४/अर्थसंकल्प ३, दिनांक १ एप्रिल , २०१९
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक बीयुडी २०१९/प्र.क्र.९६/२०१९/२५, दिनांक १ ऑगस्ट, २०१९
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- संकीर्ण२०१९/प्र.क्र.५१/सहा दिनांक २७ जुन २०१९
४) संचालक, माहिती अधिकार केंद्र, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांचे पत्र क्र. सीआरटीआय-१५१६/१/रा.प्र./२०१९-२० दिनांक १ नोव्हेंबर २०१९

**शासन निर्णय:**

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेमार्फत राज्यातील जन माहिती अधिकारी / अपीलीय प्राधिकारी यांना माहितीचा अधिकार अधिनियम २००५ बाबत प्रशिक्षण देण्यात येते. संदर्भ क्र.१ येथील शासन परिपत्रकान्वये, अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये, सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाच्या सदर योजनेतर खर्चासाठी रू.९५,२७,०००/- (रूपये पंच्याण्णव लक्ष सत्तावीस हजार फक्त) इतकी तरतुद केली असून, त्यापैकी रु. २५,४०,४४०/- एवढे अनुदान संदर्भ क्र.२ येथील शासन परिपत्रकान्वये, माहे ऑगस्ट ते डिसेंबर,२०१९ या करिता मंजूर झाले आहे. सदर योजने अंतर्गत सहाय्यक अनुदान नियंत्रक अधिका-यांच्या स्वाधीन करण्यात आले आहे.

२. संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये केलेल्या मागणीनुसार, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेला वरील अनुदानातून माहे ऑगस्ट ते डिसेंबर,२०१९ या करिता योजनांतर्गत खर्चासाठी रु. २५,४०,४४०/- (रुपये पंचवीस लक्ष चाळीस हजार चारशे चाळीस फक्त) इतके सहायक अनुदान (दुसरा हप्ता) म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

३. हा खर्च मागणी क्र.ए-४, मुख्य लेखाशिर्ष “२०७० - इतर प्रशासनिक सेवा, ००३ प्रशिक्षण राज्य योजनांतर्गत योजना, (००) (०९) माहितीचा अधिकार अधिनियमाखाली प्रशिक्षण देण्याकरिता यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांस सहाय्यक अनुदान (कार्यक्रम) (२०७० ०८२६), ३१,सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)” याखाली सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदर मंजूर अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर ती काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील त्याच शीर्षाखाली नोंदविली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसाच्या आत शासनास सादर करावे.

५. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेने आर्थिक वर्ष सन २०१९-२०२० मधील मंजूर अनुदानाइतका सिमित ठेवावा.

६. या शासन निर्णयान्वये वितरित केलेल्या अनुदानाचे तपशीलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई व शासनाला तातडीने सादर करावे.

७. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेने उपरोक्त अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

८. यशदा, पुणे या संस्थेस वितरीत केलेल्या सहायक अनुदानाची रक्कम रु. २५,४०,४४०/- (रुपये पंचवीस लक्ष चाळीस हजार चारशे चाळीस फक्त) आहरण व संवितरण अधिकारी (कोड क्र.२२०१०००१२१) यांनी आहरीत करावी.

९. संदर्भ क्र.१ येथील शासन परिपत्रक,वित्त विभाग, दिनांक १ एप्रिल, २०१९ मधील परिच्छेद क्र.६ मध्ये नमूद केल्यानुसार यशदा, पुणे या संस्थेने देयक कोषागार अधिकारी यांना सादर करताना संस्थेचे मागील महिन्यातील बँक अकाऊंट स्टेटमेंट (Bank Account Statement) देयकासोबत जोडण्यात यावे.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग एक, अनु क्र.२७, परिच्छेद क्र.१४९ नुसार व सदर अधिकारातील रकाना क्र.६खालील अटींच्या अधीन राहून प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९११३०१११७४७०७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHWETAMBARI PRAVIN KHADE

Digitally signed by SHWETAMBARI PRAVIN KHADE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=9d702814ac9e8ff679064b8a4828e61adaa1acd78f420928f8e5191c2576b1a1,
postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=8e3cff5145f3538cc2fd3c8534f86eeb0ca96ee4f337faf9d77ef01a5cc23b6b,
ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SHWETAMBARI PRAVIN KHADE
Date: 2019.11.30 11:21:24 +05'30'

**( श्वे. प्र. खडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर

३. महासंचालक, यशदा, पुणे
४. संचालक, माहिती अधिकार केंद्र, यशदा, पुणे
५. लेखाधिकारी, यशदा, पुणे (२ प्रती ).
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७. उप कोषागार कार्यालय, पुणे
८. वित्त विभाग(व्यय-४/अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
९. अवर सचिव, कार्यासन-२५, सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती/ कार्यासन सहा.